"मृत्युदंड बंदी यांचे दया याचिके संदर्भात करावयाच्या उपाय योजना संदर्भात.."

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन परिपत्रक क्र.एमआयएस ०९१२/प्र. क्र.२४९/२०१२/तुरुंग-३**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई-३२

दि.१२. ०६. २०२३

**संदर्भ**:- १) सहसचिव, गृह मंत्रालय (सीएस डिव्हीजन), भारत सरकार यांचे क्र. VII-१७०१३/१/२०१४/PR, दि.४.२.२०१४ चे पत्र

२) महाराष्ट्र कारागृह नियमावली १९७९, Chapter XLII आणि महाराष्ट्र कारागृह (कैद्यांना फाशीची शिक्षा) नियम, १९७१, दि.२५.०२.१९७१

३) मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांचे स्पेशल लीव्ह पिटीशन (क्रि.) क्र. १२६७४/२०२२ मधील दि.१३.०४.२०२३ रोजीचा निर्णय.

४) शासकीय अभियोक्ता, उच्च न्यायालय (अपीलेट साईड), मुंबई यांचे दि.१३.०४.२०२३ चे पत्र.

**प्रस्तावना:** मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांनी स्पेशल लिव्ह पिटीशन (क्रिमिनल) क्र. १२६७४/२०२२ रेणुका ऊर्फ रिंकु ऊर्फ रतन किरण शिंदे आणि इतर प्रकरणी दि. १३.०४.२०२३ रोजी खालील प्रमाणे आदेश दिले आहेत:-

*"The impugned judgment and order passed by the high court commuting the death sentence to life imprisonment is hereby modified and it is directed that the accused to undergo life imprisonment for natural life and without any remission"*

*"We observe and direct all the states/appropriate authorities before whom the mercy petitions are to be filed and/or who are required to decide the mercy petitions against the death sentence, such mercy petitions are decided at the earliest so that the benefit of delay in not deciding the mercy petitions is not accrued to the accused and the accused are not benefited by such an inordinate delay and the accused may not take the disadvantage of such inordinate delay."*

प्रस्तुत निर्णयाच्या अनुषंगाने शासकीय अभियोक्ता, उच्च्ा न्यायालय (अपीलेट साईड), मुंबई यांनी मृत्युदंड शिक्षा बंदीचे दया याचिकेच्या अनुषंगाने आवश्यक ती कार्यवाही करणेबाबत सुचित केले होते. त्यामुळे मृत्युदंड शिक्षा बंदी संदर्भात सुचना निर्गमीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक:-** मृत्युदंड शिक्षा बंदीसंदर्भात खालील सुचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.:-

१) मृत्युदंड शिक्षा बंदीच्या हिताचे संरक्षण होणेसंदर्भात केंद्र शासनाच्या गृह मंत्रालय (सीएस डिव्हीजन), भारत सरकार, नवी दिल्ली यांचे मार्फत संदर्भाधीन क्र. १ वरील दि.०४.०२.२०१४ रोजीचे पत्रान्वये आणि त्यानंतरच्या विविध पत्रांद्वारे मार्गदर्शक सुचना निर्गमीत केलेल्या आहेत. त्यामधील सुचनांची काटेकोरपणे पालन होणेसंदर्भात कारागृह अधीक्षकांनी आवश्यक ती दक्षता घेण्यात यावी.

२) महाराष्ट्र कारागृह नियमावली १९७९, Chapter XLII आणि महाराष्ट्र कारागृह (कैद्यांना फाशीची शिक्षा) नियम, १९७१, दि.२५.०२.१९७१ चे नियमांद्वारे विहीत केलेली कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

३) मृत्युदंड शिक्षा बंदी यांनी त्यांना सुनावण्यात आलेल्या शिक्षेसंदर्भात आवश्यक ते विधि सहाय्य उपलब्ध करुन देण्यात यावे. त्याचप्रमाणे शिक्षेविरुध्द भारतीय संविधानाच्या आर्टीकल १६१ आणि ७२ अन्वये बंद्याने दाखल केलेली दया याचिका संबंधितांकडे त्वरीत सादर करण्यात यावी.

४) दया याचिकेवर निर्णय घेण्यासाठी आवश्यक असणारे पोलीस रेकॉर्ड, ट्रायल कोर्टाचे न्यायनिर्णय, उच्च /सर्वोच्च न्यायालयाचे निर्णय आणि इतर अनुषंगीक कागदपत्रेही उपलब्ध करुन देण्याची दक्षता घेण्यात यावी.

५) दया याचिकांवरील मा. राज्यपाल/ मा. राष्ट्रपती महोदयांनी घेतलेल्या निर्णयाची लेखी माहिती घेण्याचा अधिकार संबंधित बंदी यांना आहे. त्यामुळे दया याचिका फेटाळल्याबद्दल बंदी आणि त्याच्या कुटुंबियांना लिखित स्वरुपात किंवा इतर साधनांद्वारे तात्काळ कळविणे आवश्यक आहे.

६) दया याचिकेवरील निर्णय त्वरेने होणेसंदर्भात आवश्यक तो पाठपुरावा करण्यात यावा.

उपरोक्तप्रमाणे तसेच केंद्र शासनाने/ राज्य शासनाने त्याचप्रमाणे मा. न्यायालयांनी वेळोवेळी दिलेल्या सुचनांनुसार मृत्युदंड शिक्षा बंदी यांचे दया याचिकेसंदर्भातील नियमानुसार योग्य ती कार्यवाही तात्काळ करण्यात यावी आणि दया याचिकेवरील निर्णयास विलंब होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

२.    प्रस्तुत शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संगणक सांकेतांक २०२३०६१२१८०४५३४७२९ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने,

VINAYAK SADASHIV CHAVAN

Digitally signed by VINAYAK SADASHIV CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=3d6fb52eeb39bf3c4a0001ceaa97736aa6fb733903d657c4d7b6e66cdadfd6fd, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=1DB7A03BD2B7B1CF5AFDC7A4A26DC14D44297AA2B63F7493C19351A3D51630D0, cn=VINAYAK SADASHIV CHAVAN
Date: 2023.06.12 18:06:20 +05'30'

**(विनायक चव्हाण)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई

२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,

३) मा.उप मुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव,

४) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई

५) प्रधान सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

६) अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे

७) अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक

१०) प्रधान सचिव (अ. व सु.) यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक

११) निवडनस्ती, तुरुंग-३.